**जलसंधारण विभाग खुद्द व विभागाच्या अधिपत्याखालील कार्यालयांतर्गत प्रलंबित असलेल्या न्यायालयीन प्रकरणांमध्ये समन्वय ठेवण्यासाठी विभागीय स्तरावरुन समन्वय समिती स्थापन करणे बाबत-**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : विधी-२०१६/प्र.क्र.२३/विधी कक्ष**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
तारीख: २१ नोव्हेंबर, २०१६

**परिपत्रक**

ग्राम विकास व जलसंधारण विभाग खुद्द व विभागाच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय कार्यालया अंतर्गत विविध न्यायालयांमध्ये प्रलंबित असलेल्या जनहित याचिका, अवमान याचिका व इतर प्रकरणांचे प्रभावी समन्वयन करुन कामकाजाच्या सोईसाठी सुसुत्रता आणण्याच्या दृष्टीने मा.उच्च न्यायालय, मुंबई व खंडपीठ नागपूर, औरंगाबाद अंतर्गत येणाऱ्या राज्यातील सर्व जिल्हा कार्यालयातील प्रकरणांचा दरमहा आढावा घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. मा.न्यायालयांमध्ये प्रलंबित असलेल्या विविध प्रकरणांमध्ये शासनाच्यावतीने विहीत वेळेत शपथपत्र दाखल करणे, मा.न्यायालयाच्या आदेशांचा आदर राखुन आदेशांची विहीत वेळेत अंमलबजावणी करणे, अवमान याचिका टाळणे या व्यतिरिक्त अशा प्रकरणी शासनाची बाजु प्रभावीपणे न मांडल्यामुळे /दिरंगाईमुळे मा.न्यायालयाचा होणार अवमान व न्याय निर्णयांमुळे अकारण शासनाला सहन करावा लागणारा मोठा आर्थिक भुर्दंड टाळता येणे शक्य व्हावे यासाठी शासनस्तरावरुन प्रभावी सनियंत्रण ठेवण्याची आवश्यकता आहे. त्याचाच एक भाग म्हणुन संगणकीय प्रणालीव्दारे ट्रॅकर प्रणाली विकसित करण्यात येत आहे. या व्यतिरिक्त न्यायालयीन प्रकरणांच्या प्रभावी समन्वयासाठी विभागीय स्तरावर पुढील प्रमाणे समन्वय समिती नियुक्त करण्यात यावी. या समितीची रचना, कार्यकक्षा, जबाबदाऱ्या पुढील प्रमाणे निश्चित करण्यात येत आहेत.

| | | |
|---|---|---|
| १ | रचना | अध्यक्ष - मुख्य अभियंता, पुणे<br>सदस्य -सर्व अधीक्षक अभियंता<br>सदस्य -सर्व कार्यकारी अभियंता |
| २ | कार्यकक्षा | १) समन्वय समितीने विभागीय स्तरावर सर्व जिल्हयांमधील त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांतील प्रलंबित न्यायालयीन प्रकरणांचा दरमहा आढावा घेणे व सध्यस्थिती जाणुन घेण्यासाठी तसेच प्रकरणी शासनाची बाजु प्रभावीपणे मांडुन प्रकरण निकाली काढण्यासाठी आवश्यक उपाय योजना करणे.<br>२) दरमहा आढावा घेण्यासाठी दरमहीन्याच्या २५ तारखेला समितीची बैठक घेण्यात यावी. त्या दिवशी सार्वजनिक सुटी असल्यास त्यानंतर येणाऱ्या लगतच्या कार्यालयीन कामकाजाच्या दिवशी समितीची बैठक न चुकता घेण्यात यावी. |

| | | |
|---|---|---|
| | | ३) समन्वय समितीच्या आढावा बैठकीचा सविस्तर अहवाल त्यांच्या अभिप्राय/ सूचनांसह सचिवांना न चुकता सादर करावा. सर्व विभागीय समन्वय समित्यांनी सादर केलेल्या बैठकींच्या अहवालातील अभिप्राय/ सूचनांचा विचार करण्यासाठी शासनस्तरावर मा.सचिवांच्या अध्यक्षतेखाली त्रैमासिक आढावा बैठक घेण्यात येईल. त्याबाबत दिनांक व स्थळाबाबतची पुर्वसूचना संबंधीतांना वेळोवेळी कळविण्यात येईल.<br>४) जिल्हानिहाय प्रकरणांचा गोषवारा जिल्हा परिषद यांचेस्तरावरुन घेऊन विभागनिहाय आढावा शासनास सादर करण्यात यावा. जिल्हानिहाय गोषवारा/ अहवाल शासनास थेट सादर न करण्याची दक्षता घेण्याचे निदेश सर्व कार्यकारी अभियंत्यांना देण्यात यावे. |
| ३ | जबाबदारी | समन्वय समितीच्या दरमहा होणाऱ्या बैठकीचा गोषवारा/ अहवाल स्वयंस्पष्ट अभिप्रायासह/ शिफारशींसह मुख्य अभियंता यांच्या मान्यतेने मा.सचिवांना सादर करण्याची जबाबदारी समन्वय समितीच्या अध्यक्षांची राहील. |
| ४ | अधिकार | न्यायालयीन प्रकरणास होणाऱ्या विलंबास, निष्काळजीपणा व दिरंगाईमुळे शासनास सहन कराव्या लागणाऱ्या नुकसानीस, अवमानना याचिका इ. जबाबदार अधिकाऱ्यांवर प्रशासकीय कार्यवाहीची शिफारस करण्याचे अधिकार या समितीला असतील. |

उपरोक्त प्रमाणे विभागीय स्तरावर तत्काळ समन्वय समित्या स्थापन करुन समन्वय समिती अध्यक्ष, सदस्य यांची नावे, पदनाम, संपर्क क्रमांक, कार्यालयीन पत्ते व ई मेल पत्ता नमुद असलेले आदेश शासनास सादर करण्यात यावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६११२२१२०१३८८८२० असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Purushottam N Bhapkar

Digitally signed by Purushottam N Bhapkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development And Water Conservation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e9878980bd80d5b35fe3e1f682b8222bb14a9c71cd698e9baa37a653df532555, cn=Purushottam N Bhapkar
Date: 2016.11.22 12:03:53 +05'30'

**(डॉ.पुरुषोत्तम भापकर)**
सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) सचिव, (ग्रावि व पंरा),ग्राम विकास व जलसंधारण विभाग यांचे समन्वय अधिकारी

२) सचिव, (ज.सं.), ग्राम विकास व जलसंधारण विभाग यांचे स्वीय सहायक
३) सचिव (प्र.मं.ग्रा.स.यो), ग्राम विकास व जलसंधारण विभाग यांचे स्वीय सहायक
४) सर्व विभागीय आयुक्त,
५) मुख्य अभियंता,लघु सिंचन (जलसंधारण), पुणे.
६) मुख्य अभियंता, विदर्भ सघन सिंचन विकास कार्यक्रम, नागपूर.
७) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा
८) सर्व उप मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा
९) सर्व सह/उप सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.
१०) सर्व अवर सचिव/ कक्ष अधिकारी, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.
११) निवडनस्ती विधी कक्ष, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.